शासकीय जमिनीचा आगाऊ ताबा देण्याबाबतचे अधिकार जिल्हाधिकारी यांना प्रत्यायोजित करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जमीन-२०१७/प्र.क्र.२३४/ज-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक: २२ ऑक्टोबर, २०१८.**

वाचा:-

१. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.जमीन-२०१५/प्र.क्र.४५/ज-१, दि.०१.०६.२०१५.

**प्रस्तावना :-**

शासकीय प्रकल्प तसेच विकास आराखडयातील सार्वजनिक सुविधा व सार्वजनिक प्रयोजन या स्वरुपाच्या विविध आरक्षणाखाली येणा-या, शासकीय जमीनी वेळीच उपलब्ध करुन न दिल्यास कालापव्यय होऊन शासकीय कार्यक्रमांच्या अंमलबजावणीमध्ये विलंब होऊ शकतो व अशा परिस्थितीत अर्थसंकल्पात केलेल्या तरतूदीचा वेळेत वापर न होता ती अखर्चित पडून राहू शकते किंवा परत करण्याची वेळ येवू शकते. तसेच, अशी कामे वेळेत पूर्ण होण्यास अडचणी निर्माण होऊ शकतात व तसे झाल्यास प्रकल्पाच्या अंदाजपत्रकीय खर्चात वाढ होऊ शकते किंवा अशा प्रसंगी शासनाचे अनुदान व्यपगत होऊ शकते. सदरहू, वस्तुस्थिती विचारात घेऊन, शासनाने संदर्भाधीन शासन निर्णय / परिपत्रकान्वये शासकीय जमिनीचा आगाऊ ताबा देण्याचे अधिकार जिल्हाधिकारी / विभागीय आयुक्त यांना प्रदान केलेले असून त्यानुषंगिक दिशानिर्देश देखील दिलेले आहेत. तथापि, जनहितांच्या शासन मान्य प्रकल्प किंवा शासकीय प्रकल्प यासाठी शासकीय जमिनीचा आगाऊ ताबा देताना भोगवटा मुल्य आकारण्याच्या बाबतीत क्षेत्रीय महसूली प्राधिकारी यांना दिशानिर्देश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

राज्यात राबविण्यात येणा-या जनहितांच्या शासन मान्य प्रकल्प ( महानगरपालिका, शासकीय प्राधिकरण) किंवा शासकीय प्रकल्प यासाठी शासकीय जमिनीचा आगाऊ ताबा

देताना भोगवटा मुल्य आकारण्याच्या बाबतीत क्षेत्रीय महसूली प्राधिकारी यांना खालीलप्रमाणे सुधारीत दिशानिर्देश या शासन निर्णयान्वये देण्यात येत आहेत:-

*"महानगरपालिका किंवा शासकीय प्राधिकरण यांना राज्य शासनाने प्रशासकीय मान्यता दिलेल्या जनहिताच्या प्रकल्पांसाठी किंवा शासकीय प्रकल्पासाठी शासकीय जमीन आवश्यक असल्यास, अशा शासकिय जमिनीचा भोगवटामुल्यरहित आगाऊ ताबा संबंधित महानगरपालिका अथवा शासकीय प्राधिकरण यांना जिल्हाधिकारी यांच्याकडून देण्यात येईल. आगाऊ ताबा दिल्यानंतर संबंधित प्राधिकरणास अशा जमिनीवर मंजूर प्रकल्पाचे काम सुरू करण्यास मुभा असेल. दरम्यान, जिल्हाधिकारी यांनी शासनाच्या प्रचलित धोरणानुसार अशा आगाऊ ताबा दिलेल्या शासकीय जमिनीचे भोगवटा मूल्य निश्चित करुन ते शासनास अदा करण्याबाबत संबंधित महानगरपालिका किंवा शासकीय प्राधिकरण यांना कळवावे. त्यानुसार जिल्हाधिकारी यांनी निश्चित केलेले भोगवटामुल्य शासनास अदा करणे संबंधित महानगरपालिकेवर किंवा शासकीय प्राधिकरणावर बंधनकारक असेल."*

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१८१०२२१६२०४११२१९** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Kshirsagar

Digitally signed by Rajendra Kshirsagar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3e673df1a1f6243d932fcb8679fc8cd85d90c61495ae8b4592f8dcc5b8a851a8, serialNumber=aa3985b8c1804418574f1872e9908934b35fbd2a705aaf56c57fbd437a59270d, cn=Rajendra Kshirsagar
Date: 2018.10.22 16:55:57 +05'30'

**राजेंद्र क्षीरसागर**
**शासनाचे सहसचिव**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव

३) मा.मंत्री (महसूल), यांचे खाजगी सचिव
४) मा.मंत्री (वित्त व नियोजन), यांचे खाजगी सचिव
५) मा.राज्यमंत्री (महसूल), यांचे खाजगी सचिव
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
७) मा. अपर मुख्य सचिव, (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, यांचे स्वीय सहाय्यक
९) प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग , मंत्रालय, मुंबई.
१०) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग , मंत्रालय, मुंबई.
११) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमीअभिलेख, पुणे.
१२) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
१४) सर्व विभागीय आयुक्त/सर्व जिल्हाधिकारी,
१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
१६) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
१७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१८) निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१९) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
२०) सर्व सहसचिव/उपसचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) सर्व “ज” समूह कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२) निवडनस्ती (कार्यासन ज-१)

*************